कुलगुरु संत गाडगेबाबा, अमरावती विद्यापीठ, अमरावती येथे अमरावती विद्यापीठाच्या मालकीच्या असलेल्या शहरातील जागेवर निवासी ज्ञान स्तोत्र आणि संशोधन केंद्रासाठी निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मुमंस २०१७/प्र.क्र.१०१/विशि-२**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : ०७ डिसेंबर, २०२१.

पहा :- १) शासन निर्णय क्रमांक : मुमंस-२०१७/प्र.क्र.१०१/विशि-२, दि.०३.१०.२०१८.
२) संचालक, उच्च शिक्षण यांचे दि.०८.११.२०२१ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना** :

संत गाडगेबाबा, अमरावती विद्यापीठ, अमरावती येथे अमरावती विद्यापीठाच्या मालकीच्या असलेल्या जागेवर निवासी ज्ञान स्तोत्र आणि संशोधन केंद्राच्या बांधकामाबाबतचा इमारतींच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास संदर्भिय क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये रु.४९९.७३ लक्ष रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यासअनुसरुन संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये रु.२५०.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. सदर इमारतीचे बांधकाम प्रगतीपथावर असून बांधकाम वेळेत पुर्ण होण्याच्या दृष्टीने उर्वरित निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती संचालक, उच्च शिक्षण यांनी संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये केली होती. तद्नुषंगाने सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने सदर बांधकामाकरीता सन २०२१-२०२२ मध्ये अर्थसंकल्पित असलेला रु.१,१४,३५,०००/- इतका निधी विद्यापीठास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संत गाडगेबाबा, अमरावती विद्यापीठ, अमरावती येथे अमरावती विद्यापीठाच्या मालकीच्या असलेल्या जागेवर निवासी ज्ञान स्तोत्र आणि संशोधन केंद्राच्या बांधकामाकरीता प्रशासकीय मान्यता दिलेल्या रक्कमेपैकी रु.१,१४,३५,०००/-इतकी तरतूद (अक्षरी रुपये एक कोटी चौदा लक्ष पसतीस हजार फक्त) वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू मंजूर झालेला निधी संत गाडगेबाबा, अमरावती विद्यापीठ, अमरावती यांना तातडीने उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, मुंबई, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता संबंधीत विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. संबंधीत विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilisation Certificate) तसेच विद्यापीठाने केलेल्या बांधकामाची सद्य:स्थिती संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास तात्काळ सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२ प्रधानशिर्ष २२०२, सर्वसाधारण शिक्षण ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०२, विद्यापीठांना सहाय्य, - (००) (१२) अमरावती विद्यापीठाचा विकास (अनिवार्य) (२२०२ ३४७७), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखालील सन २०२१-२०२२ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा सदर अटींचे तंतोतंत पालन करण्याची जबाबदारी कुलगुरु, संत गाडगेबाबा, अमरावती विद्यापीठ, अमरावती यांची राहील.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०७५/२०२१/व्यय-५, दि.२५.११.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२११२०७१७०८४८०६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2021.12.07 17:09:52 +05'30'

**(अ. म. बाविस्कर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
३) सह संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
४) कुलगुरु, संत गाडगेबाबा, अमरावती विद्यापीठ, अमरावती.
५) कुलसचिव, संत गाडगेबाबा, अमरावती विद्यापीठ, अमरावती.
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२ महाराष्ट्र, नागपूर.
७) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -२ महाराष्ट्र, नागपूर.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती / पुणे / नागपूर.
९) वित्त विभाग,(व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१०) मा. प्रधान सचिव, (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) मा.उप सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२) कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना कळविण्यात येते की, उपरोक्त वितरीत करण्यात आलेला निधी तात्काळ BDS प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात यावा.
१३) निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.